**महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून सरळसेवेने निवड झालेल्या सहायक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) संवर्गातील उमेदवारांच्या परिविक्षाधीन प्रशिक्षण कालावधीकरीता अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग, मंत्रालय,**
**शासन आदेश क्रमांक : एमएफएस-२०२०/प्र.क्र.१२६/फ-८.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०४ नोव्हेंबर, २०२०

**<u>संदर्भ</u> :-** १. शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि २०१६/ प्र.क्र.७/१६/ वित्तीय सुधारणा-१, दि.२० फेब्रुवारी, २०२०
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), म.रा. नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-९/मवसे/ मवपरि -२०१७ /प्र.क्र.३(१८-१९)/९२५/२०-२१ दि.२७/१०/२०२०

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र वनसेवा परीक्षा-२०१७ चे श्री. बी.एम. खेलबाडे व श्री. ए.एम.पवार हे दोन सहायक वनसंरक्षक श्रेणीतील अधिकारी केंद्रीय राज्य सेवा वन अकादमी, कोईम्बतुर येथे सन २०१८-२० या सत्रात नियुक्ती नंतरचे प्रशिक्षण घेत आहेत. उपरोक्त दोनही अधिकारी यांचे २ वर्षाचे नियुक्ती नंतरचे प्रशिक्षण पुर्ण करुन कोईम्बतूर अकादमीतुन दिनांक ११/११/२०२० रोजी (मध्यान्होत्तर) कार्यमुक्त होत आहेत.

**२.** सहायक वनसंरक्षक पदाच्या सेवा प्रवेश नियम १९९८ चे नियम ६ नुसार सरळसेवेने नियुक्त झालेल्या सहायक वनसंरक्षक श्रेणीतील अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी ३ वर्षाचा असुन त्यामध्ये नियुक्तीनंतरचे २ वर्षाचे प्रशिक्षण व त्यांनतर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) म.रा. नागपूर यांनी निश्चित केले प्रमाणे १ वर्षाचे क्षेत्रिय प्रशिक्षण याचा समावेश आहे.

**३.** शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि २०१६/ प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१ दि.२० फेब्रुवारी, २०१६ मध्ये पदनिर्मिती, पदभरती व पदांचे पुनरुज्जीवन याबाबतचे निर्बंध व अनुषंगिक आढावे- तांत्रिक बाबीसाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्याच्या तरतुदीत सुधारणा करणे. याअनुषंगाने खालील प्रमाणे तरतूद आहे.

***"महाराष्ट्र लोकसेवा आयोग/ केंद्रीय लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवारांना विहीत परिविक्षा कालावधी / प्रशिक्षण कालावधी या तांत्रिक करणसाठी विशिष्ट कालावधीकरिता निर्माण करावयाच्या अधिसंख्य पदांच्या निर्मितीचे अधिकार यापुढे संबंधित प्रशासकीय विभागांना राहतील. तथापि, प्रशिक्षणासाठी हजर झालेल्या उमेदवारांइतकीच अधिसंख्य पदे निर्माण करणे व अधिसंख्य पद निर्मितीच्या आदेशात प्रशिक्षण कालावधी नमूद करणे विभागास बंधनकारक राहील."*** अशी तरतूद आहे.

**४.** प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), म.रा. नागपूर यांनी प्रस्तावित केल्यानुसार व सेवाप्रवेश नियम १९९८ चे नियम ६ मधील तरतुदीनुसार निश्चित केल्याप्रमाणे १ वर्षाचे क्षेत्रिय प्रशिक्षणाकरिता, शासन वित्त विभाग निर्णय दि.२०/०२/२०१६ मध्ये नमूद केल्यानुसार सहायक वनसंरक्षक या श्रेणीत दोन अधिसंख्य पदांची निर्मिती करण्यास व वन विभागातील एका वर्षाचे क्षेत्रिय प्रशिक्षण देण्यासाठी या आदेशान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | परिविक्षाधिन सहायक वनसंरक्षकाचे नांव | अधिसंख्य पदाचा कालावधी | प्रस्तावित वन विभाग | वनवृत्त |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. भरत माणीकराव खेलबाडे | दि.१२/११/२०२० ते दि.११/११/२०२१ | पुसद | यवतमाळ |
| २ | श्री. अमरजीत मोहनराव पवार | दि.१२/११/२०२० ते दि.११/११/२०२१ | सातारा | कोल्हापूर |

५. सदरहू अधिसंख्य पदाच्या वेतनावर येणारा खर्च हा "मुख्य लेखाशिर्ष २४०६- वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर) १०१ वनसंधारण व विकास, १०१ (०१) प्रशासन व संरक्षण (२४०६-००९६) ०१- वेतन" या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२०११०४११५८२२२३१९ असा आहे .हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Niwrutti Dhas

Digitally signed by Anil Niwrutti Dhas
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=699d21cc89897191099434d443603426329c81b1b292ed2d168c892811118cc7, serialNumber=f85f1c64c05886c8d514e40d54d27ff3a80ffd907a05433b1c412b7f7ffa0afd, cn=Anil Niwrutti Dhas
Date: 2020.11.04 12:03:22 +05'30'

**(अनिल धस)**
कक्ष अधिकारी
महसूल व वन विभाग.

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर.
४) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक ), यवतममाळ / कोल्हापूर .
५) उप वनसंरक्षक, वन विभाग पुसद / सातारा.
६) महालेखापाल,महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र -१, मुंबई.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, यवतममाळ / कोल्हापूर
८) प्रधान सचिव (वने) यांचे स्वीय सहाय्यक.